महाराष्ट्र जमीन महसूल संहिता (गौण खनिजांचे उत्खनन व ती काढणे (दूसरी सुधारणा) नियम, २०१८ याबाबत दिशानिर्देशक सूचना..

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन प्‌रिपत्रक क्रमांकः गौखनि १०/०११९/प्र.क्र५/ख-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
तारीख: १२/०२/२०१९.

वाचा :-

१) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्रमांक गौखनि १०/०२१५/प्र.क्र.९२/ख, दि. १२/०१/२०१८.

२) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्रमांक गौखनि १०/०२१५/प्र.क्र.९२/ख, दि. १७/११/२०१८.

**-: शासन परिपत्रक :-**

शासन अधिसूचना क्रमांक गौखनि १०/०२१५/प्र.क्र.९२/ख, दिनांक १७/११/२०१८ अन्वये स्वामित्वधन न आकारता आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांकरीता असलेल्या शासनाच्या कोणत्याही गृहनिर्माण योजनेअंतर्गत स्वत:च्या घराच्या बांधकामासाठी पाच ब्रासपेक्षा अधिक नाही एवढी वाळू काढण्यास परवानगी देण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. सदर तरतूदींची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकरीता आवश्यक त्या सूचना संबंधितांना देणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयांना खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

१. आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकाकरीता असलेल्या शासनाच्या कोणत्याही गृह निर्माण योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना त्याला वाळू उत्खनन/वाहतूकी करीता परवाना मिळावा यादृष्टीने ग्रामसेवक/ गट विकास अधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यापैकी कोणीही तहसिलदारांकडे त्याच्या तालुक्यातील शासनाच्या गृहनिर्माण योजनेच्या लाभार्थ्यांची गावनिहाय यादी पाठवावी.

२. अशा यादीतील लाभार्थ्यांच्या संख्येच्या अनुषंगाने तहसिलदार यांनी सदर लाभार्थी बांधकाम करीत असलेल्या घराच्या जवळ असलेल्या आणि पर्यावरण विषयक मंजूरीप्राप्त वाळूघाटातून वाळू उत्खननाची परवानगी ७ दिवसांचे आत द्यावी व त्यापोटी तहसिलदारांनी अशा लाभार्थ्यांच्या यादीसाठी एकत्रितात आदेश पारीत करावे.

३. तहसिलदार यांनी असे आदेश पारीत केल्यानंतर प्रति लाभार्थी एकूण ५ ब्रास वाळूच्या परिमाणाच्या प्रमाणात zero royalty वाहतूक पासेस संबंधित तलाठ्याकडे त्वरीत सुपुर्द करावेत. असे आदेश आणि zero royalty वाहतूक पासेस तहसीलदारांकडून प्राप्त झाल्यानंतर संबंधित तलाठ्याने ७ दिवसांच्या आत अशा आदेशातील संबंधित लाभार्थ्यांशी संपर्क साधून अशा zero royalty वाहतूक पास वर वाळू उत्खनन करावयाची मुदत, वाळूचे परिमाण (ब्रासमध्ये), ज्या वाहनातून वाळू वाहतूक करणार त्या वाहनाची माहिती व ज्या वाळू स्थळातून उत्खनन करावयाचे आहे ते वाळू स्थळ व ज्याठिकाणी वाळू वाहून न्यावयाची आहे ते ठिकाण, कालावधी व इतर आवश्यक बाबी नमूद करुन असे zero royalty वाहतूक पासेस संबंधित लाभार्थ्यांना वितरीत करावेत.

४. तहसीलदारांकडून प्राप्त झालेल्या zero royalty वाहतूक पासेसचे वितरण तहसीलदार यांच्या आदेशातील लाभार्थ्यांना केल्याबद्दल तलाठी यांनी स्वतंत्र नोंदवही ठेवून त्यामध्ये लाभार्थ्यांची असा zero royalty वाहतूक पास प्राप्त झाल्याबद्दल स्वाक्षरी घ्यावी. वितरीत केलेल्या zero royalty पासेसचा हिशोब तलाठी यांनी संबंधित तहसीलदार यांना दर १५ दिवसांनी सादर करावा. संबंधित तहसीलदार यांना तलाठी यांचेकडून प्राप्त झालेला zero royalty वाहतूक पासेसचा हिशोब योग्य असल्याची खात्री करुन त्याबाबत आवश्यक माहिती जिल्हाधिकारी यांना पाठवावी. कोणत्याही परिस्थितीमध्ये या zero royalty वाहतूक पासेसचा गैरवापर होणार नाही याची सर्वस्तरावरुन खात्री करण्यात यावी. अशा zero royalty वाहतूक पासेसचा गैरवापर/गैरव्यवहार निदर्शनास आल्यास त्यास जबाबदार अधिकारी/कर्मचारी व्यक्ती यांच्याविरुध्द तातडीने फौजदारी गुन्हा दाखल करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१२१६०५४२७६१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, serialNumber=aa3985b8c1804418574f1872e9908934b35fbd2a705aaf56c57fbd437a59270d, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2019.02.12 16:08:49 +05'30'

**(राजेंद्र क्षीरसागर)**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मलबार हिल मुंबई. (पत्रान्वये)

२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (महसूल) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (महसूल) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
७) प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर.
८) सर्व विभागीय आयुक्त.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
११) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व उपविभागीय अधिकारी.
१३) सर्व तहसिलदार.
१४) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई.
१५) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), नागपूर.
१६) सर्व मंत्रालयीन विभाग.
१७) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.